श्री. सुधाकर बबनराव राऊत, कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (स्थापत्य) यांना उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेली पदोन्नती रद्द करण्याबाबत.
(सन २०२१-२२ ची निवडसूची.)

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन आदेश क्रमांक : एसएलएस २०२३/(प्र.क्र.७/२३)/आ(वर्ग-२)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - ६ एप्रिल, २०२३

**वाचा :- १) जलसंपदा विभाग, शासन आदेश क्रमांक: एसएलएस -२०२१/प्र.क्र.३५/२०२१/आ(वर्ग-२), दि. ३१/०३/२०२२**
**२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/०९/२०१६**

**शासन आदेश-:**

विभागातील श्री. सुधाकर बबनराव राऊत यांची कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) (स्थापत्य)(पदविकाधारक) "गट-ब" (वेतनश्रेणी रुपये ४१८००-१३२३००/- Pay Band S-१५) या निम्न संवर्गातून उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) "गट-अ" (वेतनश्रेणी रुपये ५६१००-१७७५००/- Pay Band S-२०) या पदावर सन २०२१-२२ च्या दिनांक ३१.०३.२०२२ रोजीच्या पदोन्नती आदेशान्वये पदोन्नतीने नागपूर महसुल विभागांतर्गत मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत रिक्त पदी पदस्थापना देण्यात आली आहे. सदर पदोन्नती आदेशातील श्री. सुधाकर बबनराव राऊत (ज्ये.क्र. २८३९)(इ.मा.व.) यांनी त्यांना देण्यात आलेली पदोन्नती नाकारली आहे.

२. श्री. सुधाकर बबनराव राऊत यांनी त्यांना देण्यात आलेली उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावरील पदोन्नती नाकारली असल्यामुळे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.: एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि. १२.०९.२०१६ अनुसार त्यांचे नाव सन २०२१-२२ च्या तात्पुरत्या निवडसूचीतून वगळण्यात येत आहे. त्याचप्रमाणे श्री. सुधाकर बबनराव राऊत यांच्या नावाचा पुढील दोन वर्ष म्हणजेच सन २०२२-२३ व सन २०२३-२४ मध्ये होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये विचार न करता

तिसऱ्या वर्षी म्हणजेच सन २०२४-२५ मध्ये होणाऱ्या निवडसूचीत उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**३.** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि. १२.०९.२०१६ मधील क्रमांक ८ अनुसार श्री. सुधाकर बबनराव राऊत, कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता (स्थापत्य) यांनी पदोन्नती नाकारली असल्यामुळे आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ दिले असल्यास ते काढून घेण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/आदेशांनुसार मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांनी कार्यवाही करावी.

**४.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०४०६१७४९२३००२७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BAPUSAHEB R SONAWANE

Digitally signed by BAPUSAHEB R SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aa9f65e90f34e5648365a67ac974407846b2378509021d9a9b764788f91300c2, pseudonym=97A776F6F30F8466194234A275563339B9998934, serialNumber=8D6647630D541B9030FF94EF31AFD6FA8B275E0E15A69D5F68163604468DC5D6, cn=BAPUSAHEB R SONAWANE
Date: 2023.04.06 17:54:26 +05'30'

**(बापूसाहेब रा. सोनवणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
७. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
८. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर
९. उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सामान्य प्रशासन विभाग (१२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई.
११. संबंधित अधिकारी (संबंधित कार्यालयामार्फत).
१२. कार्यासन अधिकारी आ(वर्ग-१)/आ(तांत्रिक)/आ(शा.अ.)/गोपनीय शाखा ,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१३. आ (वर्ग-२) कार्यासन, संग्रहार्थ.